राज्यातील दिव्यांगांच्या अनुदानित विशेष शाळा, संलग्न वसतिगृहे कर्मशाळा (प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांकरीताच्या बालगृहांतील शिक्षक व शिक्षकेतर संवर्गातील रिक्त असलेली पदे पदभरतीच्या निर्बंधातून मुक्त करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

दिव्यांग कल्याण विभाग

**शासन निर्णय क्र. याचिका-२०२१/ प्र.क्र.१३/दि.क.१**

३१, ३२, ३५ ए, मित्तल टॉवर, ए-विंग, तिसरा मजला

बॅरीस्टर रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१

दिनांक :- २६ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१. मा. सर्वोच्च न्यायालयाचे रिट याचिका क्र.१३२/२०१६ (रजनिश कुमार पांडे विरूध्द युनियन ऑफ इंडिया व इतर) या याचिकेतील आदेश दिनांक २८ ऑक्टोबर, २०२१,
२. मा.राज्य मानवी हक्क आयोगाकडील सुमोटो केस क्रमांक : ४२१३ / १३ / १६ / २०२२,
३. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२००३ / प्र. क्र. ३४० / भाग-३ / सुधार-२, दिनांक १८ ऑगस्ट, २००४,
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२० / प्र. क्र. ६५ / अर्थ-३, दिनांक ४ मे, २०२०,
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि-०६१७ / प्र.क्र. २० / आपुक, दिनांक ९ जून, २०१७ अन्वये गठीत उपसमितीच्या दिनांक १८ जानेवारी, २०२३ व दिनांक २० मार्च, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०२२ / प्र.क्र. १५ / आ.पु.क., दिनांक २७ एप्रिल, २०२२.

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या संदर्भ क्र. १ येथील न्याय निवाड्यातील परिच्छेद क्रमांक ५९ मधील निर्देशांच्या त्याचप्रमाणे मा. राज्य मानवी हक्क आयोगाकडील सुमोटो याचिकेवरील सुनावणीच्या अनुषंगाने राज्यातील दिव्यांगांच्या अनुदानित दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतिगृहे व प्रशिक्षण केंद्र (कार्यशाळा), अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा व संलग्न कार्यशाळांमधील रिक्त असलेली शिक्षक व शिक्षकेतर संवर्गातील पदे, वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ४ मे, २०२० मधून निर्बंध मुक्त करून तातडीने सरळसेवेने भरण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक १० सप्टेंबर, २००१ अन्वये स्थापित उच्चस्तर सचिव समितीसमोर शासकीय, निमशासकीय कार्यालयांतील तसेच शासनाचे अंगिकृत उपक्रम, महामंडळे, अनुदानित संस्था, इ. उपक्रमांमधील पदे नव्याने निर्माण करणे, व्यपगत ठरविणे,

व्यपगत ठरविलेली पदे पुनर्जिवीत करणे, इ. बाबतचे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी शासन निर्णय दिनांक ९ जून, २०१७ अन्वये स्थापित करण्यात आलेल्या उपसमितीच्या शिफारशीने सदरचे प्रस्ताव उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक असते. त्यानुसार उक्त उपसमितीच्या दिनांक १८ जानेवारी, २०२३ रोजीच्या बैठक क्र. १ /२०२३ अन्वये, राज्यातील दिव्यांगांच्या अनुदानित दिव्यांगांच्या विशेष शाळा व प्रशिक्षण केंद्र (कार्यशाळा), अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा व संलग्न कार्यशाळा यांमधील रिक्त असलेली शिक्षक संवर्गातील रिक्त पदे व दिनांक २० मार्च, २०२३ रोजीच्या बैठक क्र.३/२०२३ अन्वये उपरोक्त उपक्रमांतील रिक्त असलेली शिक्षक / शिक्षकेतर संवर्गातील रिक्त पदे, वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ४ मे, २०२० च्या निर्बंधातून मुक्त करण्यास खालीलप्रमाणे शिथिलता दिलेली आहे:-

१) वित्त विभागाच्या उपसमितीच्या दिनांक १८ जानेवारी, २०२३ रोजीच्या बैठकीतील सुचनेनुसार उपरोक्त उपक्रमांतील शासन निर्णय दिनांक १८ ऑगस्ट, २००४ च्या आकृतीबंधानुसार अनुज्ञेय ठरणारी शिक्षकीय संवर्गातील रिक्त असलेली पदे भरण्यासाठी वित्त विभागाच्या दिनांक ४ मे, २०२० च्या शासन निर्णयातील निर्बंधांतून शिथीलता देण्यात आली आहे.

२) उपरोक्त उपक्रमांतील शिक्षकेतर संवर्गातील खालील तक्ता "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे नियमित तत्त्वावरील एकूण ५०८ रिक्त पदे व सदर अनुदानित विशेष शाळा / कार्यशाळा व संलग्न वसतीगृहे यांचा सुधारीत आकृतीबंध अंतिम होईपर्यंत खालील तक्ता "ब" मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण २३७ मनुष्यबळाच्या मर्यादेत बाह्य यंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा/पदे भरण्यास मान्यता देण्यात आली.

| (अ) **भरण्यास मान्यता दिलेली पदे** | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **पदनाम** | **पद भरतीस मान्यता दिलेली पद संख्या** |
| १ | अंध-चलन वलन अवयव निदेशक | ०४ |
| २ | मुकबधिर-वाचा उपचार तज्ञ | ३७ |
| ३ | मतिमंद-मानसशास्त्रज्ञ/ व्यवसाय उपचार तज्ञ/ भौतिकोपचार तज्ञ, स्पास्टिक | ४१ |
| ४ | अस्थिव्यंग-फिजीओ थेरेपिस्ट/व्यवसायोपचार तज्ञ | २० |
| ५ | वसतिगृह अधिक्षक/गृहपाल, परिचारीका (मतिमंद शाळेकरिता) या संवर्गातील एकूण ११३ रिक्त पदांच्या ५०% | ५६ |
| ६ | काळजीवाहक | ३५० |
| | **एकूण** | **५०८** |
| **(ब) बाहयस्त्रोताव्दारे घ्यावयाच्या सेवा** | | |
| **अ.क्र.** | **सेवा** | **मनुष्यबळ** |
| १ | मानद वैदयकीय अधिकारी व पुनर्वसन सामाजिक कार्यकर्ता नि सेवायोजन अधिकारी | १३४ |
| २ | वाहनचालक, बहुउददेशिय गट-ड कर्मचारी (वाहन परिचर, मदतनीस, सफाईगार, पहारेकरी, शिपाई) २०६ रिक्त पदांपैकी ५०% | १०३ |
| | **एकूण** | **२३७** |

**टिप - बाह्यस्त्रोताव्दारे सेवा घेतांना वित्त विभागाच्या दिनांक २७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे अनुपालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.**

२. **उपरोक्त १ (१) मधील नमूद निर्बंध शिथिलतेमुळे विभागाची ११६७ शिक्षक संवर्गाची पदे भरण्याच्या प्रस्तावास मान्यता प्राप्त आहे**.

३. उपरोक्त मुद्दा १ व २ येथे नमूद रिक्त असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर पदांच्या भरतीसंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी प्रवर्ग निहाय एकत्रित प्रस्ताव खालील नमुन्यामध्ये दिनांक १० ऑगस्ट, २०२३ पर्यंत विभागास सादर करावा.

| **अ.क्र.** | **संस्थेचे नांव** | **अनुदानित शाळा / कर्मशाळा / बालगृह इ. चे नांव व पत्ता** | **शासन निर्णय दिनांक १८ ऑगस्ट, २००४ अनुसार (पदनामनिहाय)** | | | **नोंदणी प्रमाणपत्राच्या वैधतेचा कालावधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | **मंजूर पदे** | **भरलेली पदे** | **रिक्त पदे** | |
| १ | २ | ३ | ४ (अ) | ४ (ब) | ४ (क) | ५ |

ब) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांच्याकडून प्राप्त रिक्त पदांच्या प्रस्तावाची पदभरतीच्या नियमानुसार तपासणी करून शासन स्तरावरुन दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यत तपासणी मध्ये अनुज्ञेय ठरलेल्या पदांना शाळा/ कार्यशाळा निहाय ना-हरकत प्रमाणपत्र निर्गमित करील.

क) शासनाकडून रिक्त पदे भरण्यासाठी ना-हरकत प्रमाणपत्र मिळाल्यानंतर संबधित सक्षम प्राधिकारी तथा स्वयंसेवी पालक संस्थेने ना-हरकत प्रमाणपत्र मिळाल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांत शासनाने विहीत केलेल्या सरळसेवा भरती विषयक नियमांचे पालन करुन भरती प्रक्रीया पूर्ण करणे बंधनकारक राहील. त्यामुळे आयुक्तालयाने व संस्थांनी ना-हरकत प्रमाणपत्र संस्थांना दिल्याच्या दिनांकाची योग्य नोंद ठेवावी.

३. सदर भरती प्रक्रीयेत अनियमितता झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबधीत स्वयंसेवी पालक संस्थेची राहील.

४. समितीने मान्यता दिलेल्या सर्व अनुज्ञेय पदांची भरती प्रक्रीया संबधित संस्थेने विहीत वेळेत पूर्ण केल्यानंतर एक महिन्याच्या आत याबाबतचा अहवाल विभागास सादर करण्याची जबाबदारी आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांची राहील.

५. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाचे पत्र क्रमांक : पदनि-२०२३ / प्र.क्र. १६ / आपुक, दि.२७ मार्च, २०२३ सोबतच्या नविन पदनिर्मिती / पदांचे पुनरुज्जिवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करुन शिफारशी करण्यासाठी तसेच काल्पनिक पदे निर्माण करण्यास व रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याकरिता गठीत केलेल्या उपसमितीच्या दि.२०.०३.२०२३ रोजी झालेल्या सन २०२३ मधील तिसऱ्या बैठकीच्या इतिवृत्तास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७२७१२३०१०२५३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHNUDAS
PUNDLIKRAO
GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2023.07.27 12:31:13 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव.
२) सचिव (दि.क.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,
५) सहायक आयुक्त, मुंबई शहर / मुंबई उपनगर,
६) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषदा,
७) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) सह / उपसचिव, वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) निवड नस्ती (दिव्यांग कल्याण-१)